**सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षामध्ये अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याकरिता संस्था/शाळांची निवड करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नानिशा-२०२०/प्र.क्र.७०(भाग-१)/का.१२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०२ फेब्रुवारी, २०२२.

**वाचा :**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का.१३, दि.२८.०८.२००९
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक :- नानिशा-२०१८/प्र.क्र.२१/का.१२, दि.१८.०५.२०१८.
३) आदिवासी विकास विभाग, शासन शुध्दिपत्रक क्रमांक :- नानिशा-२०१८/प्र.क्र.२१/का.१२, दि.९.०६.२०१८.

**प्रस्तावना :**

अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबतची योजना संदर्भ क्र. १ येथील दि.२८.०८.२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात राबविण्यात येत आहे. सदर योजना अंमलबजावणीमध्ये सुसूत्रता आणण्याकरिता शाळेमध्ये उपलब्ध शैक्षणिक व निवासी सोयी सुविधा आणि त्याच्या दर्जानुसार गुणांकन निश्चित करून प्राप्त गुणांकनानुसार शाळांची निवड करणे व शाळांना द्यावयाचे शुल्क निर्धारीत करण्याकरिता संदर्भ क्र. २ येथील दि.१८.०५.२०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार धोरण ठरविण्यात आलेले आहे.

उपरोक्त तरतूदीस अनुसरून नामांकित योजनेंतर्गत चालू शैक्षणिक वर्ष सन २०२१-२२ करिता अनुसूचित जमातीचे विद्यार्थी प्रवेशित करण्याच्या अनुषंगाने सदर योजनेंतर्गत यापूर्वी निवड करण्यात आलेल्या जुन्या शाळांमार्फत प्राप्त संमतीपत्र यास अनुसरून नामांकित योजनेंतर्गत संस्था/शाळांची निवड करणे व अशा शाळांमध्ये अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना प्रवेशित करण्यास मंजूरी देण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षाकरिता अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण देणे या योजनेंतर्गत विहित निकष पूर्ण करीत असलेल्या खालीलप्रमाणे नमूद केलेल्या संस्था/ शाळांची निवड करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून सदर शाळांमध्ये मंजूर करण्यात येत असलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत अनुसूचित जमातीचे विद्यार्थी प्रवेशित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षाकरिता आदिवासी विकास विभागांतील यापूर्वी निवड करण्यात आलेल्या जुन्या शाळा तसेच योजनेंतर्गत प्रचलित निकष पूर्ण करत असलेल्या एकूण ३०

शाळांमध्ये सन २०२१-२२ करिता नवीन विद्यार्थी प्रवेशित करण्याबाबत निर्णय घेण्यात आला. अपर आयुक्त, आदिवासी विकास कार्यालयनिहाय सदर शाळांची यादी खालीलप्रमाणे आहे.

## अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक

| अ. क्र. | प्रकल्प कार्यालयाचे नाव | नामांकित निवासी शाळेचे नाव व पत्ता | प्रस्तावित विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|
| १ | नाशिक | आर.पी. गोडगे पाटील इंग्लिश मिडीयम स्कूल, वावी, ता. सिन्नर, जि. नाशिक | १०० |
| २ | नाशिक | शताब्दी इंग्लिश मिडीयम स्कूल, आगासखिंड, ता. नाशिक, जि. नाशिक | १०० |
| ३ | कळवण | जयहिंद इंग्लिश मिडीयम स्कूल, दाभाडी, ता. मालेगाव, जि. नाशिक | २०० |
| ४ | धुळे | हस्ती पब्लिक स्कूल, दोंडाईचा, ता. शिंदखेडा, जि. धुळे | १०० |
| ५ | यावल | लिटल हार्ट इंग्लिश मिडीयम स्कूल, वेले, ता. चोपडा, जि. जळगाव | ५० |
| ६ | यावल | लिटील व्हॅली प्री प्रायमरी व बालविश्व प्रायमरी स्कूल, कासोदा, ता. एरंडोल, जि. जळगाव | ५० |
| ७ | यावल | सुरेशचंद्र बी. संघवी इंटरनॅशनल स्कूल, उत्राण, ता. एरंडोल, जि. जळगाव | ५० |
| ८ | यावल | जैन इंटरनॅशनल स्कूल, पळासखेडा, ता. जामनेर, जि. जळगाव | १०० |
| ९ | राजूर | लोटस इंग्लिश मिडीयम स्कूल, वडगावपान, ता. संगमनेर, जि. अहमदनगर | १०० |
| १० | यावल | आयडियल इंग्लिश मिडीयम स्कूल, जळगाव, जि. जळगाव | १०० |
| ११ | नाशिक | एस.एन.डी. इंग्लिश मिडीयम पब्लिक स्कूल, बाभुळगाव, ता. येवला, जि. नाशिक (एस.एस.सी.) | ५० |
| १२ | नाशिक | एस.एन.डी. इंग्लिश मेडीयम पब्लिक स्कुल, बाभुळगाव, ता. येवला, जि. नाशिक (सीबीएसई) | ५० |
| १३ | कळवण | स्वामी विवेकांनद स्कूल फॅार एक्सलंस, अंजग, ता. मालेगाव, जि. नाशिक | १०० |
| १४ | नाशिक | डॉ. डी. एस. आहेर पब्लिक स्कूल, विठेवाडी, ता. देवळा, जि. नाशिक | १०० |
| **सन २०२१-२२ करीता नवीन विद्यार्थी प्रवेशित करावयाची संख्या** | | | **१२५०** |

## अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे

| अ. क्र. | प्रकल्प कार्यालयाचे नाव | नामांकित निवासी शाळेचे नाव व पत्ता | प्रस्तावित विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|
| १ | शहापूर | डी.एस.डी. स्कूल, कल्याण, जि. ठाणे | ५० |
| २ | पेण | नम्रता आचार्य इंग्लिश मिडीयम स्कूल, शेलू, ता. कर्जत, जि. रायगड | २०० |
| **सन २०२१-२२ करीता नवीन विद्यार्थी प्रवेशित करावयाची संख्या** | | | **२५०** |

## अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती

| अ. क्र. | प्रकल्प कार्यालयाचे नाव | नामांकित निवासी शाळेचे नाव व पत्ता | प्रस्तावित विद्यार्थी संख्या |
|---|---|---|---|
| १ | धारणी | ज्ञानपिठ इंग्लिश मिडीयम, अंजनगाव सुर्जी, जि. अमरावती | २०० |
| २ | धारणी | दर्यापूर इंग्लिश प्रायमरी ॲन्ड सेकंडरी हायस्कूल, सासन रामपूर, ता. दर्यापूर, जि.अमरावती | १५० |
| ३ | पांढरकवडा | रेड्डीस कॉन्व्हेंट, पाटणबोरी, ता. केळापूर, जि. यवतमाळ | २०० |
| ४ | कळमनुरी | व्हिजन पब्लिक स्कूल, ता. सोनपेठ, जि. परभणी | १५० |
| ५ | कळमनुरी | केंब्रिज स्कूल ऑफ स्कॉलर, कळमनुरी, जि. हिंगोली | १०० |
| ६ | कळमनुरी | सरस्वती इंटरनॅशनल पब्लिक स्कूल, कुर्तडी, ता. जि. हिंगोली | ५० |
| ७ | कळमनुरी | हायटेक प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, एरंडेश्वर, ता. पुर्णा, जि. परभणी | १०० |
| ८ | किनवट | गोदावरी मनार पब्लिक स्कूल, शंकरनगर, ता. बिलोली, जि. नांदेड | ५० |
| ९ | औरंगाबाद | स्वामी विवेकानंद इंटिग्रेशन स्कुल, एम. आय. डी. सी., लातूर | ५० |
| १० | कळमनुरी | कै. मानसिंग नाईक इंग्रजी प्राथमिक व माध्यमिक विद्यालय, सायखेडा, ता. सोनपेठ, जि. परभणी | ५० |
| ११ | कळमनुरी | एल.के.आर.आर. प्रिन्स इंग्लिश स्कूल, खळगाव रोड, सेलू जि. परभणी | ७५ |
| १२ | किनवट | महात्मा फुले इंग्लिश स्कूल, जळकोट रोड, ता. जळकोट, जि. लातूर | १०० |
| १३ | किनवट | शंकरराव चव्हाण इंटरनॅशनल स्कूल ॲन्ड ज्युनिअर कॉलेज, दत्तनगर, नांदेड | १०० |
| १४ | किनवट | राजश्री पब्लीक स्कूल, नांदेड | १०० |
| **सन २०२१-२२ करीता नवीन विद्यार्थी प्रवेशित करावयाची संख्या** | | | **१४७५** |

**२. नामांकित शाळेत प्रवेश देताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे :-**

I. संबंधित संस्था/शाळा मार्फत शासनाला सादर केलेल्या प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे सर्व सोयी सुविधा देण्यास तयार आहेत, याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी खातरजमा करावी व संस्थेसोबत तसा करारनामा करण्यात यावा.

II. संस्था/शाळेमार्फत आदिवासी विद्यार्थ्यांसाठी वेगळी तुकडी/वर्ग सुरु करणे अपेक्षित नाही, शाळेमध्ये सुरु असलेल्या नियमित तुकडी/वर्गामध्येच इतर विद्यार्थ्यांसमवेत योजनेंतर्गत प्रवेशित अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शिक्षण देणे बंधनकारक राहील. आदिवासी विद्यार्थ्यांसाठी वेगळी तुकडी/वर्ग सुरु केल्याचे आढळल्यास सदर संस्थेवर गुन्हा नोंदविण्याची कारवाई करण्यात येईल व शाळेची मान्यता तात्काळ रद्द करण्यात येईल.

III. संस्थांनी मुलींच्या वसतीगृहात महिला अधिक्षिका व केअरटेकर यांची नियुक्ती करणे बंधनकारक आहे. याची पुर्तता न आढळल्यास शाळेची मान्यता रद्द करण्यात येईल.

IV. सदर योजनेंतर्गत शासनाने मान्यता दिलेल्या शाळांमध्येच आणि संबंधित शाळेकरिता मंजूर केलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेतच अनुसूचित जमातीचे विद्यार्थी प्रवेशित करण्याबाबत अपर आयुक्त, आदिवासी विकास व प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

V. योजनेच्या मूळ तरतूदीनुासर कुटुंबाचे वार्षिक उत्पन्न रू.१ लाख एवढ्या कमाल मर्यादेत असणाऱ्या पाल्यांनाच सदर योजनेचा लाभ देण्यात यावा.

VI. प्रकल्प अधिकारी यांनी विद्यार्थी प्रवेशित करताना जवळच्या शाळेमध्ये तसेच संबंधित प्रकल्पातील निवड करण्यात आलेल्या शाळांना प्राधान्य देऊन विद्यार्थी प्रवेशाची प्रक्रिया तात्काळ पूर्ण करावी.

VII. एखाद्या प्रकल्प कार्यक्षेत्रातील निवड करण्यात आलेल्या शाळा व त्यामध्ये मंजूर विद्यार्थी संख्या यापेक्षा योजनेंतर्गत प्रवेशाकरिता प्राप्त अर्जांची संख्या जास्त असल्यास प्रकल्प अधिकारी यांनी विदयार्थ्यांची निवड ड्रॉ पध्दतीने करुन निवड यादी जाहीर करावी. तसेच निवड न झालेल्या विदयार्थ्यांची यादी प्रसिध्द करावी. प्रकल्पामधील निवड करण्यात आलेल्या शाळेमध्ये विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात यावा.

VIII. सदर योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांच्या संस्थाचालक/ मुख्याध्यापका यांच्या समवेत अपर आयुक्त यांनी शैक्षणिक वर्षाच्या प्रथम व द्वितीय सत्रामध्ये बैठक घेऊन प्रवेशित विद्यार्थ्यांची शैक्षणिक प्रगती व त्यांना पुरविण्यात येणाऱ्या सुविधांबाबत आढावा घ्यावा.

IX. नामांकित योजनेंतर्गत शाळेची निवड झाल्यानंतर पहिल्या सत्रात दोन वेळा, तसेच द्वितीय सत्रात दोन वेळा संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी अचानक नामांकित शाळांना व्यक्तीश: भेट देऊन सदर शाळेमधील सौदार्हपुर्ण वातावरण, विदयार्थ्यांवर अत्याचार, त्यांना देण्यात येणाऱ्या सुविधा, औषधोपचार, शैक्षणिक दर्जा, पोषण ईत्यादी सर्व बाबींबाबतचा अहवाल अपर आयुक्त, आदिवासी विकास; आयुक्त, आदिवासी विकास यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

X. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का.१३, दि.२८.०८.२००९; आदिवासी विकास विभाग, आणि आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र नानिशा-२०१८/प्र.क्र.२१/का-१२, दि.१८.०५.२०१८ मधील विहित तरतूदींचे काटेकोरपणे पालन करावे. सदर तरतूदींचे पालन न करणाऱ्या शाळांची मान्यता सन २०२१-२२ मध्ये रद्द करण्यात येईल.

XI. नवीन विद्यार्थ्यांना इयत्ता १ ली व इयत्ता २ री या ईयत्तेमध्येच प्रवेश देण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

XII. नामांकित योजनेंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या नामांकित शाळेमध्ये विद्यार्थी प्रवेशित करताना ज्या इयत्तेत विद्यार्थी प्रवेशित करावयाचे आहेत, अशा इयत्तेत संबंधित शाळेमध्ये नामांकित योजनेव्यतिरिक्त प्रवेशित इतर विद्यार्थी (Non-namankit students) संख्येच्या समप्रमाणाच्या कमाल मर्यादेत राहतील याची दक्षता घेण्यात यावी. (नामांकित योजनेंतर्गत प्रवेशित विद्यार्थी कमाल ५० टक्के : योजनेव्यतिरिक्त प्रवेशित इतर विद्यार्थी किमान ५० टक्के)

३. ज्या नामांकित संस्थेत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांस प्रवेश देण्यात येणार आहे, त्या संस्थेबरोबर संबंधित प्रकल्प अधिका-यांनी करारनामा करावा. सदर करारामध्ये नामांकित योजनेंतर्गत अनुसचित जमातीच्या विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात आलेल्या वर्गापासून इयत्ता १२ वी पर्यंत त्यांचे शिक्षण, आरोग्य, सुरक्षा, निवास, आहार व अन्य विहीत सोयी सुविधा पुरविण्याबाबत व स्वतंत्र वर्ग न करण्याबाबत बाबींचा समावेश करण्यात यावा. तसेच नामांकित योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या सर्व नामांकित शाळांचे प्रत्येक वर्षी नवीन शैक्षणिक वर्ष सुरू होण्यापूर्वी योजनेकरिता विकसित करण्यात आलेल्या ऑनलाईन प्रणालीवर गुणांकन करण्यात येईल व आवश्यक विहीत शैक्षणिक व निवासी सोयी सुविधा यामध्ये निवड करण्यात आलेल्या नामांकित शाळांमध्ये त्रुटी आढळून आल्यास किंवा विहीत गुणांकनानुसार शाळा अपात्र ठरल्यास संबंधित शाळेची नामांकित योजनेंतर्गतची मान्यता रद्द करून प्रवेशित करण्यात आलेले अनुसूचित जमातीचे विद्यार्थी इतरत्र समायोजित करण्यात येतील, याचा देखील करारनाम्यात समावेश असावा.

नामांकित योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या शाळांमार्फत बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार, अधिनियम, २००९ व त्याअंतर्गत केलेले व केले जाणारे सर्व नियमांची / तरतूदींची तसेच इयत्ता १ ली मध्ये शाळा प्रवेशासाठी बालकाच्या किमान वयाबाबत शिक्षण विभागाने निश्चित केलेल्या तरतूदीचे पालन करणे आवश्यक आहे.

४. नामांकित इंग्रजी शाळेत अनुसूचित जमातीचे विद्यार्थ्यांची प्रवेश प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर प्रत्यक्षात प्रवेशित विद्यार्थी संख्येच्या प्रमाणात ऑनलाईन प्रणालीवर तयार होणाऱ्या देयकानुसार आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी संबंधित शाळेस थेट ऑनलाईन प्रणालीमार्फत निधी वितरीत करावा. सद्यस्थितीत कोविड विषाणूच्या प्रादूर्भावामूळे खर्चात काटकसर करण्याबाबतचे वित्त विभागाचे धोरण आहे. त्यानुसार सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षाकरिता शासनामार्फत निर्धारीत करण्यात येणारे शुल्क संबंधित शाळेस थेट ऑनलाईन प्रणालीमार्फत वितरीत करण्यात यावे. तसेच कोविड विषाणूच्या पार्श्वभूमीवर सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास कार्यालयांकडे

विहित कालावधीत प्रवेश प्रक्रीया पूर्ण न झाल्याने, नामांकित शाळांकडे प्राप्त विद्यार्थ्यांचे अर्जांचा विचार करुन मंजूर विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत प्रवेशपात्र विद्यार्थ्यांना प्रवेशोत्तर मान्यता प्रकल्पस्तरावर देण्याची कार्यवाही करण्यात यावी.

५. सदर योजनेची अंमलबजावणी संबंधित प्रकल्प अधिकारी करतील तसेच अपर आयुक्त, आदिवासी विकास योजनेचे "पर्यवेक्षकीय अधिकारी" म्हणून व आयुक्त, आदिवासी विकास नाशिक हे "नियंत्रक अधिकारी" म्हणून जबाबदारी पार पाडतील.

६. सदर योजनेसाठी होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

" मागणी क्र. टी- ५

२२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण-

पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना-जनजाती क्षेत्र उपयोजना-

०२- अनुसूचित जमातीचे कल्याण

७९६,जनजाती क्षेत्र उपयोजना- राज्य योजनांतर्गत योजना

(०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना

(०२) (२९)- अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण देणे.

(२२२५ सी-९९९) ३१ " सहायक अनुदाने (वेतनेतर) "

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०२१७४३४०८५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PAWANKUMAR
BAPURAO BANDGAR

Digitally signed by PAWANKUMAR BAPURAO BANDGAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de4f5b7703ab4e5e10ca414432353e1fedec0ed7e9030a2b4ef40ed6f5180db0, pseudonym=5EB45DBDB7827935E861F4F138005D49199129A1, serialNumber=DDD9DA8FA21A90D7D094A7A2B297309EED70A74C6C632CA84301EB132C1FB5FD, cn=PAWANKUMAR BAPURAO BANDGAR
Date: 2022.02.02 17:44:58 +05'30'

**( पवनकुमार बंडगर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई.
३) मा.मंत्री, (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
४) मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
७) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर
९) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
१०) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/अमरावती/ठाणे.

११) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

१२) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर

१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

१४) सर्व संबंधित संस्था/शाळा. (संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत)

१५) निवड नस्ती का-१२.